गडहिंग्लज पंचायत समिती (जिल्हा कोल्हापूर) प्रशासकीय इमारतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.....

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २००९/प्र.क्र.१३/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २९ जानेवारी,२०१०

संदर्भ :- अति.मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.,कोल्हापूर यांचे पत्र क्र.बाखा/रेशा/वशि/२२/१०,दिनांक ५.१.२०१०

प्रस्तावना :-

अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., कोल्हापूर यांनी संदर्भीय दि.५.१.२०१० च्या पत्रान्वये गडहिंग्लज पंचायत समितीकरीता नविन प्रशासकीय इमारत बांधण्याच्या प्रस्तावास मान्यता मिळण्याची विनंती केली आहे.

२. गडहिंग्लज पंचायत समितीच्या कार्यालयाची सन १९६२-६५ मध्ये बांधण्यात आलेली इमारत फार जुनी झालेली असून, पंचायत समितीकडील विविध विभाग व अधिकारी/कर्मचाऱ्यांची संख्या लक्षात घेता, सदर इमारत अपुरी पडत आहे. अन्य कार्यालये इतरत्र विखुरलेली असल्याने सर्व कार्यालये एकाच प्रशासकीय इमारतीत आणण्याच्या दृष्टीने अस्तित्वातील जुने बांधकाम पाडून त्या ठिकाणी नविन प्रशासकीय इमारत बांधण्याचे प्रस्तावित करण्यात आले आहे. याकरीता पंचायत समितीने दिनांक ११.१२.०९ रोजी ठराव पारित केला आहे.

गडहिंग्लज पंचायत समितीच्या नविन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाकरीता अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांनी उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.विभाग, नागपूर यांच्याकडील टाईप प्लॅन **T-ADM/5511, Drg. No.15 & 22 to 25** या नमुना नकाशानुसार आराखडा तयार केला आहे. त्यानुसार तळमजला अधिक पहिला मजला असे एकूण ९७०.६८ चौ.मी. क्षेत्रफळाचे बांधकाम प्रस्तावित केले असुन, सदर बांधकामाचे क्षेत्रफळ हे पं.स.च्या प्रशासकीय इमारतीकरीता अनुज्ञेय केलेल्या १०२६.५० चौ.मी. क्षेत्रफळाच्या मर्यादेत आहे. या कामी उप अभियंता (बांध.), जि.प.कोल्हापूर यांनी रु.१,५९,८५,७०७/- किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक तयार केले असून, ते कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प., कोल्हापूर यांनी साक्षांकित केले आहे. या कामाकरीता सन २००८-०९ ची दरसुची विचारात घेण्यात आली आहे. अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांनी प्रस्तावासोबत अस्तित्वातील इमारत मोडकळीस आल्याचे प्रमाणपत्र, बांधकामाचा नमुना नकाशा, साईट प्लॅन, अस्तित्वातील जागेचा नकाशा व फोटो, ठरावाची प्रत इ. कागदपत्रे सादर केलेली आहेत.

३. अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांनी केलेल्या तांत्रिक छाननी अंती, गडहिंग्लज पंचायत समितीच्या रु.१,५९,८६,०००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

-: शासन निर्णय :-

गडहिंग्लज (जिल्हा-कोल्हापूर ) पंचायत समितीकरीता जुने बांधकाम पाडून त्या ठिकाणी नवीन प्रशासकीय इमारतीच्या एकूण रक्कम रुपये- १,५९,८६,०००/- (रुपये एक कोटी एकोणसाठ लक्ष श्याहऐंशी हजार फक्त) इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

(१) नियोजित गडहिंग्लज पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीचे बांधकामाकरीता मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.वि. मुंबई यांच्या नमुना नकाशामध्ये शासन मान्यते शिवाय कोणताही फेरबदल करण्यात येवू नये.
(२) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.
(३) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रमा किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी. प्रमा किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.
(४) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.

(५) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

४. गडहिंग्लज पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे:-

| GENERAL ABSTRACT | | |
|---|---|---|
| Sr. | Work Details | Amount (Rs.) |
| 1 | Cost of.Building | 12202830.00 |
| 3 | Add 11% For Electrification. | 1342311.00 |
| 2 | Add 8% For External water supply and sanitary arrangement | 976226.00 |
| 8 | Add 6% For increase in DSR Rate (Price Escalation) | 732170.00 |
| 4 | Add 4% For Contingencies | 488113.00 |
| 5 | Add 2% For computerization | 244057.00 |
| | Total Estimated cost Rs. | 15985707.00 |
| | Say | Rs.1,59,86,000/- |

५. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल.

६. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, सा.बां.वि. किंवा मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो. यांच्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

८. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र.२०१००१२९१४४०५४००१ असाआहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) विभागीय आयुक्त औरंगाबाद विभाग, पुणे
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस,मध्यवर्ती इमारत, पुणे
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर
५) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर
६) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद कोल्हापूर
७) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोल्हापूर
८) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
९) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा पुणे विभाग, पुणे
१०) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोल्हापूर
११) सभापती, पंचायत समिती, गडहिंग्लज, जिल्हा कोल्हापूर
१२) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, गडहिंग्लज, जिल्हा कोल्हापूर
१२) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४) सार्वजनिक बांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१५)का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई

C:\DO_RRD_PARA7\BLDG PROPOSAL\PSE 2009-C.R.13_Gadhinglaj_Kolhapur.doc